**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत मंजूर कोल्हापूर महानगरपालिकेच्या बस खरेदी प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या पहिल्या हप्त्याचे अनुदान वितरण.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासननिर्णयक्रमांकः एनयुआर-२०१५/प्र.क्र.०९(१)/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १२ फेब्रुवारी, २०१५

<u>वाचा -</u>

**१) केंद्रीय शहरी विकास मंत्रालयाचे आदेश क्रमांक के-१४०११/०९/२०१४-युटी-१, दि.१७/१०/२०१४.**

<u>प्रस्तावना -</u>

नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेऊन केंद्र शासनाने देशातील ठराविक शहरांमध्ये पायाभूत सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी "जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम दिनांक ३ डिसेंबर, २००५ रोजी जाहीर केला आहे.

**०२.** उक्त कार्यक्रमांतर्गत कोल्हापूर महानगरपालिकेच्या बस खरेदी या प्रकल्पास केंद्र शासनाच्या केंद्रीय मंजुरी व संनियंत्रण समितीने (Central Sanctioning and Monitoring Committee) मंजुरी दिली होती. संदर्भाधीन आदेशान्वये कोल्हापूर महानगरपालिकेच्या बस खरेदी प्रकल्पासाठी ठराविक निधी वितरित करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या सदर मंजुरीनुसार तसेच उक्त योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र शासनाच्या वितरित करावयाच्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | महानगर-पालिकेचे नाव व प्रकल्प नाव | बसचा प्रकार | बसेस संख्या | केंद्र शासनाने निश्चित केलेली प्रकल्प किंमत(as per purchase order) | केंद्र शासनाचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ८० टक्के) | राज्य शासनाचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या २० टक्के) | सध्या वितरीत करावयाचा केंद्र शासनाचा हप्ता | केंद्र शासनाने सध्या वितरीत केलेल्या निधीच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ५ | ६ | ७ | ९ |
| १ | कोल्हापूर महानगर पालिका बस खरेदी प्रकल्प | मिडी नॉन ए.सी.डिझेल बसेस | ७५ | १५.७० | १२.५६ | ३.१४ | ६.२८ | पहिला |

०३. वरील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे कोल्हापूर महानगरपालिकेस बस खरेदी प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय —

जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानातंर्गत कोल्हापूर महानगरपालिकेस बस खरेदी प्रकल्पासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. राज्य शासनाच्या हिश्याचा तिसऱ्या हप्त्याचा निधी स्वतंत्रपणे वितरीत केला जात आहे.

(रुपये कोटीत)

| अ. क्र. | महानगर-पालिकेचे नाव | योजनेचे स्वरूप | मंजूर किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय निधी | केंद्र शासनामार्फत वितरीत हप्त्याचा निधी | केंद्र शासनाने वितरीत करावयाच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | कोल्हापूर | बस खरेदी प्रकल्प | १५.७० | १२.५६ | ६.२८ | पहिला |

०२. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.६ येथील रकमेचे वितरण अनुदान म्हणून करण्यात येत आहे. त्यानुसार तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे रुपये सहा कोटी, अठ्ठावीस लक्षफक्त(रुपये ६,२८,००,०००/-) इतका निधी वितरित करण्यासाठी मंजुरी देण्यात आली असून यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी सदर अनुदान रुपये सहा कोटी, अठ्ठावीस लक्ष फक्त(रुपये ६,२८,००,०००/-)इतक्या रक्कमेचा धनादेश आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका (Commissioner,Kolhapur Municipal Corporation) या नावे काढून तो आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३. जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाच्या UIG या उपभियानांतर्गत प्रकल्पाचे SLNA तथा विशेष कार्य अधिकारी (JNNURM), मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी या संदर्भात आवश्यक तो पाठपुरावा करून सदरहू निधी विहित मुदतीत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वितरीत केला जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

०४. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र सादर करावे. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र कोल्हापूर महानगरपालिकेकडून प्राप्त करून घेऊन महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी या नात्याने संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांची राहिल.

०५. केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष पाहणीद्वारे या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल. सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दर ३ महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच केंद्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

०६. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०७. कोल्हापूर महानगरपालिकेस देण्यात येणा-या अनुदान रुपये सहा कोटी, अठ्ठावीस लक्ष फक्त(रुपये ६,२८,००,०००/-) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, केंद्र सहाय्यीत योजना (००) (४८) जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत महानगरपालिकांना सहायक अनुदान (२२१७ १४०१), ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), दत्तमत, १९१-महानगरपालिकांना सहाय्य या लेखशिर्षामधून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०८. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७/व्यय-३, दि. १६/०१/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१६०५२४३१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.02.12 16:17:21 +05'30'

**ज.ना.पाटील**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, नागपूर.
३. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. विशेष कार्य अधिकारी तथा नोडल एजन्सी फॉर जे.एन.एन.यु.आर.एम. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुबई ५१.
८. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त,कोल्हापूर महानगरपालिका, जिल्हा कोल्हापूर.
१०. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
११. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
१२. निवडनस्ती, नवि-३३